विभागीय पुनर्विलोकन समिती गठित करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः पसंप्र-२०१४/ प्र.क्र.२२८/ पदुम-१**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई - ४०००३२.**
**दिनांक : ०४ डिसेंबर, २०१४.**

**वाचा :-** १) सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्र. एसआरसी- १०७६/१२७५/१५, दि.१६.६.१९७६
२) सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्र. एसआरसी- १०८५/१०२९/४३/१५, दि. १२.५.१९८६
३) सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्र. विपुस- १०९७/प्र.क्र.१३६/९७/१५, दि.१९.६.१९९८

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ च्या नियम १० (४) व नियम ६५ अनुसार सार्वजनिक हितास्तव अकार्यक्षम व संशयास्पद सचोटीच्या अधिकारी / कर्मचारी यांना वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा कालवधी पूर्ण झाल्यावर, यापैकी जे अगोदर घडेल तेव्हा, सेवेत राहण्याची पात्रापात्रता (पात्र/अपात्र) आजमविण्याच्या दृष्टीने त्यांचे पुनर्विलोकन करून सुयोग्य व कार्यक्षम अधिकारी / कर्मचारी यांना शासन सेवेत पुढे चालू ठेवावे व अकार्यक्षम तसेच संशयास्पद सचोटी असणाऱ्या अधिकारी / कर्मचारी यांना शासन सेवेतून मुदतपूर्व सेवानिवृत्त करावे असे शासनाचे धोरण आहे.

२. सदर पुनर्विलोकन धोरणानुसार, पशुसंवर्धन विभागामधील पुनर्विलोकनास पात्र होणाऱ्या गट- अ व गट- ब मधील अधिकारी यांना वयाच्या ५०/५५ वर्षापलीकडे किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्ष पूर्ण झाल्यानंतर सेवेत राहण्यासाठी पात्रपात्रता (पात्र / अपात्र) आजमविण्याच्या दृष्टीने त्यांचे पुनर्विलोकन करुन शिफारस करण्यासाठी / नियमानुसार आवश्यक ती पुढील कार्यवाही करण्यासाठी पुढीलप्रमाणे विभागीय पुनर्विलोकन समिती गठित करण्यात येत आहे :-

| **विभागीय पुनर्विलोकन समिती** | | |
|---|---|---|
| १ | सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | उपसचिव (मत्स्यव्यवसाय) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३ | उपसचिव (पशुसंवर्धन) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य सचिव |

३. पूर्वपृष्ठावरील पुनर्विलोकन समितीचे कामकाज शासनाने पुनर्विलोकनाविषयी विहित केलेल्या निर्कषानुसार, मार्गदर्शक सूचनांनुसार व विहित कार्यपध्दतीनुसार राहिल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२०५१११८१४३२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Patil Bhaskar Raghunath

Digitally signed by Patil Bhaskar Raghunath
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agricultural and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Patil Bhaskar Raghunath
Date: 2014.12.05 11:25:39 +05'30'

**(भा.र. पाटील)**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१. सचिव (पदुम) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२. उपसचिव (मत्स्यव्यवसाय), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
३. उपसचिव (पशुसंवर्धन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
४. उपसचिव (का- १५), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. निवडनस्ती.